**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्र. केमाअ-२००८/प्र.क्र.३५६/०८/सहा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३१/५/ २०१२.

**शासन परिपत्रक :-**

माहिती अधिकारासंदर्भातील केंद्र शासनाचा " माहितीचा अधिकार अधिनियम, २००५" दिनांक १२/१०/२००५ पासून अंमलात आला आहे. या अधिनियमांच्या अंमलबजावणीकरीता जरुरी असणारे नियम करण्याचे अधिकार कलम २७ (२) अन्वये राज्य शासनांना देण्यात आलेले आहेत. त्यानुसार, राज्य शासनाने महाराष्ट्र माहितीचा अधिकार (दुसरी सुधारणा) नियम, २०१२ तयार केला असून हे नियम दिनांक ३१/१/२०१२ च्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर शासन राजपत्राची प्रत सोबत पाठविण्यात येत आहे.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक 201206120640320100 असा आहे.

31/05/2012

**( ज्ञा.ल.सुळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

राज्यपालांचे सचिव.
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मुख्य सचिव.
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
* महाप्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा).
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा).

*	महाप्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
*	प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई.
*	सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*	सचिव, महाराष्ट्र विधानमडळ सचिवालय, मुंबई.
*	सचिव, राज्य निवडणुक आयोग, मुंबई.

सर्व विभागीय आयुक्त.

सर्व जिल्हाधिकारी.

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

सर्व महानगर पालिका आयुक्त.

सचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, मुंबई.

महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रबोधिनी, पुणे.

सर्व मंत्रालयीन विभाग (अधिनस्त कार्यालयांच्या तसेच अधिनियमातील कलम २ (ज) मधील व्याख्येनुसार सार्वजनिक प्राधिकरणांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह)

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

*पत्राने.

RNI No. MAHBIL/2009/31733
Reg. No. MH/MR/South-322/2010-12

# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार-अ

वर्ष ३, अंक ७३] गुरुवार, फेब्रुवारी २, २०१२/माघ १३, शके १९३३ [पृष्ठे ३

किंमत : रुपये १४.००

## असाधारण क्रमांक ११

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

**सामान्य प्रशासन विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३१ जानेवारी २०१२

**अधिसूचना**

**माहितीचा अधिकार अधिनियम, २००५.**

क्रमांक केंमाअ-२००८/१०१०/प्र.क्र. ३५६/सहा.—माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ (२००५ चा २२) याच्या कलम २७, पोट-कलम (२) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या आणि याबाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्र शासन, याद्वारे, महाराष्ट्र माहितीचा अधिकार नियम, २००५ यात आणखी सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत आहे :—

(१) या नियमांना, महाराष्ट्र माहितीचा अधिकार (दुसरी सुधारणा) नियम, २०१२ असे म्हणावे.

(२) महाराष्ट्र माहितीचा अधिकार नियम, २००५ च्या नियम ३ क नंतर पुढील नियम ज्यादा दाखल करण्यात येईल :—

" **३ख. अभिलेख तपासण्याकरिता त्याची मागणी करण्याची कार्यपद्धती.**—कलम ६ च्या पोट-कलम (१) अन्वये अभिलेख तपासण्याकरिता त्याची मागणी करण्यासाठी अर्जदाराने दाखल केलेल्या अर्जावर विचार करण्यात आल्यावर, जन माहिती अधिकाऱ्यास सदर अर्ज योग्य असल्याचे आढळून आल्यास, अर्जदारास अभिलेख तपासण्याकरिता परवानगी देण्यात येईल आणि जर अशी परवानगी त्याला मिळाली तर जन माहिती अधिकारी, अवलोकनार्थ अर्जदाराला पाहिजे असलेल्या अभिलेखांची विभागाच्या संबंधित कक्षाकडून मागणी करील आणि तो अभिलेख आपल्या उपस्थितीत किंवा त्याने प्राधिकृत केलेल्या प्रतिनिधीच्या उपस्थितीत, कार्यालयीन वेळेत अर्जदारास देईल. अशा अभिलेख्यांची तपासणी करताना, अर्जदारास केवळ पेन्सिलचा वापर करण्याची परवानगी राहील आणि अर्जदारास पाहिजे असलेली माहिती त्याला पेन्सिलीनेच टिपून घेता येईल. जर अर्जदाराने पेन्सिल व्यतिरिक्त अन्य कोणतेही लेखनसाहित्य आणले तर तो ते लेखनसाहित्य जन माहिती अधिकाऱ्याकडे जमा करील, आणि त्यानंतर, त्याला अभिलेख तपासण्याची मुभा देण्यात येईल. अर्जदाराला तपासणीच्या वेळी जी पेन्सिल वापरण्याची मुभा देण्यात आलेली असेल त्या पेन्सिलीने अभिलेखावर कोणत्याही प्रकारची खूण करता येणार नाही. "

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**नंदकुमार जंत्रे,**
शासनाचे सचिव.

## GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 31st January 2012.

*NOTIFICATION*

RIGHT TO INFORMATION ACT, 2005.

No. CRTI. 2008/CR 356/VI.—In exercise of the powers conferred by sub-section 27 of the Right to Information Act, 2005 (22 of 2005) and of all other powers enabling in this behalf, the Government of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Right to Information Rules, 2005, namely :—

(1) These rules may be called the Maharashtra Right to Information (2nd Amendment) Rules, 2012.

(2) After rule 3A of the Maharashtra Right to Information Rules, 2005, the following rules shall be added, namely :—

3B.—*Procedure for seeking inspection of record.*—If after having considered the application filed by the applicant for seeking inspection of record under sub-section (*1*) of section 6, the Public Information Officer find it appropriate, the applicant may be granted permission to inspect the record and if he grants such permission the Public Information Officer shall requisition the record desired by the applicant for perusal, from the concerned section of the Department and shall give the same to the applicant for inspection in his presence or in the presence of his authorised representative, during office hours. While inspecting such record, the applicant shall be allowed to use pencil only and the information desired by the applicant shall be noted by him by pencil only and If the applicant bring any writing instruments other than a pencil, he shall deposit the same with the Public Information Officer and, thereafter, he shall be allowed to inspect the record. The applicant shall not make any marking on the record by the pencil he is allowed to use during inspection ".

By order and in the name of the Governor of Maharashtara,

NANDKUMAR JANTRE,
Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATIONS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.